सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता मुख्यलेखाशीर्ष २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा, ०९०-सचिवालय (००) (१६) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी तरतूद (२०५२५०७२) (कार्यक्रम) खालील १७-संगणक खर्च या तपशीलवार शीर्षाखालील मंजूर अनुदानातून निधी वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र.अर्थसं-२७२५/प्र.क्र.१०९/मातं**

मादाम कामा मार्ग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दि.१७ जून, २०२५

**प्रस्तावना-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत राज्य शासनासाठी राबविण्यात येणारे विविध प्रकल्प उदा. सी.एम. डॅश बोर्ड, सी.एम हेल्पलाईनशी संबधित प्रदाने, सिक्युरीटी ऑपरेशन सेंटर, तसेच इतर ई-गव्हर्नन्स प्रकल्पांवरील होणारा खर्च माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून (२०५२५०७२) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखालील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात येतो. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार सदर उद्दिष्टाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून रु. २,७५,२९,०००/-(अक्षरी रु.दोन कोटी पंचाहत्तर लाख एकोणतीस हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५ अन्वये सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर २०२५ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत बिम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

२. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात सी.एम. डॅशबोर्ड, सी.एम हेल्पलाईनशी संबधित प्रदाने तसेच ई-गव्हर्नन्सशी संबधित प्रदानांवरील खर्च भागविण्याकरिता (२०५२५०७२) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत तरतूदीच्या मर्यादेत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने मागणी केल्यानुसार रु. २,७५,२९,०००/-(अक्षरी रु.दोन कोटी पंचाहत्तर लाख एकोणतीस हजार फक्त ) इतका निधी वित्त विभागाच्या खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) मागणी केलेल्या निधीची रक्कम उचित असल्याची खातरजमा माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने करण्यात यावी.

२) प्रस्तावाधीन लेखाशिर्षांतर्गत उद्दिष्टामधून करण्यात येणाऱ्या खर्चाची बाबनिहाय उपयोगिता प्रमाणपत्रे माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने सादर करावीत.

३) सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मागणी केला आहे त्याकरीता खर्च करण्याची व निधी वितरीत करताना विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्याची दक्षता माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने घ्यावी.

**३.** माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने सी.एम. डॅशबोर्ड, सी.एम हेल्पलाईनशी संबधित प्रदाने तसेच ई-गव्हर्नन्सशी संबधित प्रदानांवरील खर्च मागणी क्रमांक-ए-४, सचिवालय सर्वसाधारण सेवा ०९० सचिवालय (००) (१६) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी तरतूद (२०५२५०७२) (कार्यक्रम) १७- संगणक खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने सदर खर्च करतांना वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३१६/१४४३ दि.२८.०५.२०२५ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३७२/व्यय-४ दि.११.०६.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०६१७१७४५३५८७०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

EKNATH KASHINATH GAGARE

Digitally signed by EKNATH KASHINATH GAGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=General Administration Dep., 2.5.4.20=D9A3CCBC053D2CF9B4C30C85BB8DB0E6C39331B90D48B0ABA6CDE387B5EC208C, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BC79F4A08CA2D5D74E02E7214F6AAD4EF7D9AFDEBA5BFCDEF24D45049099939, cn=EKNATH KASHINATH GAGARE
Date: 2025.06.17 17:46:37 +05'30'

**( एकनाथ गागरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) उपसचिव,वित्त विभाग (व्यय-४) ,मंत्रालय, मुंबई
६) उपसचिव, नियोजन विभाग (का.१४४३),मंत्रालय, मुंबई
७) उपसचिव,अर्थसंकल्प शाखा (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती